आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या योजनेकरीता केंद्र हिश्श्याचा सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील अखर्चित निधी सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित तरतूदीतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता. **(२२१० F७३८).**

महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र. क्र.०५/ कार्यासन. ०६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: - ८ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.१.०४.२०१९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.८.०७.२०१९.

३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.संकीर्ण-०६१९ /प्र.क्र.३८२/ आरोग्य- ७.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- ०३-ग्रामीण आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान ( केंद्र हिस्सा ), (२२१० F७३८ ), ३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर ) या शिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाकरिता रु. १२४६९.६१ लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

२. उपरोक्त योजनेंतर्गत सन २०१८-१९ मधील अखर्चित निधी केंद्र शासनाने पुनरूज्जीवित केला आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या वाचा क्र. ३ येथील प्रस्तावानुसार सदर योजनेच्या केंद्र हिश्श्याकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील अखर्चित निधीपोटी आदिवासी घटक कार्यक्रम सन २०१९-२० मधील (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ) (२२१० F७३८ ), ३१- सहायक अनुदाने ( वेतनेत्तर ) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून रू. ३०६.०० लाख (अक्षरी रूपये तीन कोटी सहा लाख फक्त) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची

दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. २८९ /व्यय-१३, दि. १६.०९.२०१९ अन्वये दिलेल्या मंजूरीस अधिन राहून निर्गमित करण्यात येत असून संदर्भाधीन शासन निर्णयातील अटींची पुर्तता होत असल्याची सार्वजनिक आरोग्य विभागाने खात्री करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०७१५५४४७२०२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2019.11.08 17:47:22 +05'30'

( रविंद्र दि. औटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
११) कार्यासन अधिकारी (का. ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.